निवडसूची सन २०२०-२१
उप संचालक भूमि अभिलेख, गट-अ
संवर्गामध्ये पदोन्नतीने पदस्थापना देण्याबाबत...

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग
शासन आदेश क्रमांक : आस्था-२०२०/प्र.क्र.१५१(भाग-२)/ई-६
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
दिनांक : ०२ जून, २०२३.

वाचा: जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख (म.रा.), पुणे यांचे पत्र क्र.आस्था-२/ त.अ. ०७/१९/९९०८, दिनांक ०९.०५.२०२३ चे पत्र.

शासन आदेश :-

भूमि अभिलेख विभागातील जिल्हा अधीक्षक भूमि अभिलेख, गट-अ या संवर्गामधून उप संचालक भूमि अभिलेख, गट-अ या संवर्गामध्ये पदोन्नती देण्यासाठी सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दिनांक ०७.०५.२०२१ मधील तरतुदी विचारात घेऊन निवडसूची २०२०-२१ मधील पात्र अधिकारी श्री.विलास गणपतराव शिरोळकर, जिल्हा अधिक्षक भूमि अभिलेख, गट-अ (ज्ये.क्र.१९), यांना **उप संचालक भूमि अभिलेख, (गट-अ) (वेतनश्रेणी एस-२३-रु.६७,७००-२,०८,७००)** या संवर्गामध्ये तदर्थ पदोन्नती देण्यात येवून त्यांची खालीलप्रमाणे पदोन्नतीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव | ज्येष्ठता क्रमांक | पदोन्नतीने पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | श्री.विलास गणपतराव शिरोळकर, जिल्हा अधिक्षक भूमि अभिलेख, | १९ | उप संचालक भूमि अभिलेख ,नाशिक प्रदेश, नाशिक |

२. उक्त नमूद जिल्हा अधीक्षक भूमि अभिलेख, गट-अ या संवर्गातील अधिकाऱ्यास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून उप संचालक भूमि अभिलेख, गट-अ संवर्गामध्ये तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे:-

१. मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधीन राहून पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दि.२५.०५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात भरण्याबाबत सा.प्र.वि./१६ब कार्यासनाच्या दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सूचनांनुसार सदर मान्यता देण्यात येत आहे. तसेच दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयाप्रकरणी मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आलेले असून त्यावरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून सदर पदोन्नती देण्यात येत आहे.
२. सदरची पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात प्रशासकीय निकड म्हणून लोकहितास्तव देण्यात आली आहे.
३. या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा व सेवाज्येष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही.
४. निवडसूची तयार करताना कोणीही ज्येष्ठ अधिकारी अनावधानाने वगळण्यात आलेले नाहीत अथवा अधिक्रमित झालेले नाहीत.
५. दिव्यांग कर्मचाऱ्यांना गट-अ व गट-ब मधील पदांवर पदोन्नतीबाबत मा.उच्च न्यायालय, मुंबई यांच्या दि.२२.०७.२०२१ रोजीच्या निर्णयानुसार दिव्यांग आरक्षणासह पदोन्नतीसाठीची सर्व रिक्त पदे सा.प्र.वि./१६-अ यांनी दि.०५.०७.२०२१ रोजीचा शासन निर्णय व दि.२३.०७.२०२१ च्या शासन पत्रान्वये दिलेल्या सूचनांनुसार सदर मान्यता देण्यात येत आहे.
६. उक्त अधिकाऱ्यांना देण्यात आलेली ही पदोन्नती कोणतीही पूर्व सुचना वा नोटीस न देता रद्द करण्याचा अधिकार शासन राखून ठेवीत आहे.
७. संबधीत अधिकाऱ्यांनी पदोन्नती नाकारल्यास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/कार्यासन-१२, दिनांक १२.०९.२०१६ मधील तरतुदीनुसार कार्यवाही करण्यात येईल.

८. पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्यांनी उप संचालक भूमि अभिलेख, गट-अ या पदावर कार्यभार ग्रहण केल्यानंतर त्या अधिकाऱ्यांची शासनाने वेळोवेळी विहीत केलेल्या नियमानुसार वेतननिश्चिती करण्यात यावी.

**३.** पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्यांची उप संचालक भूमि अभिलेख, गट-अ या पदावरील तात्पुरती पदोन्नती ही त्यांच्याविरुध्द प्रस्तुत आदेशाच्या दिनांकापर्यंत कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी सुरु झालेली नाही वा प्रस्तावित नाही या धारणेच्या अधीन राहून देण्यात येत आहे. त्यानुसार जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (म.राज्य), पुणे यांनी खातरजमा करुन संबंधित अधिकाऱ्यांविरुध्द विभागीय चौकशीची कार्यवाही सुरु वा प्रस्तावित असल्यास शासनास अवगत करावे.

**४.** पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्यांनी उप संचालक भूमि अभिलेख, गट-अ या पदावरील तात्पुरत्या पदोन्नतीचे आदेश निघाल्याच्या दिनांकापासून तीस दिवसांमध्ये उप संचालक भूमि अभिलेख, गट-अ या पदावर रुजू होणे आवश्यक आहे. याबाबत संबंधित अधिकाऱ्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का-१२, दिनांक १२.०९.२०१६ मधील तरतुदीकडे वेधण्यात येत आहे.

**५.** संबंधीत अधिकाऱ्यांच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांनी वर नमूद अधिकाऱ्यांना, पदोन्नतीने पदस्थापना दर्शविलेल्या पदावर रुजू होण्याकरीता तात्काळ कार्यमुक्त करावे. संबंधीत अधिकाऱ्यांना नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यासाठी मुळ कार्यालयाने कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले, आणि ते नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले, याबाबत जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (म.रा.), पुणे यांनी शासनास अवगत करावे.

**६.** सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२३०६०२१४१४४५९३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY BANKAR

Digitally signed by SANJAY BANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c8a7d6860ff227fd9e69a02e9ca5dfb2ccb25eda92d749629970f349fc6ed260, pseudonym=B37546F6A6BD466ED45270ED708F924F51A07EA8, serialNumber=C5917E56B0DA516AB259D846D516CB0584DCE5E9A2E73C0A35FA47BAB64E88AA, cn=SANJAY BANKAR
Date: 2023.06.02 14:16:34 +05'30'

**( संजय बनकर )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:**

१) जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख (म.रा.), पुणे.
२) उप संचालक भूमि अभिलेख, संलग्न जमाबंदी आयुक्त कार्यालय, पुणे (सर्वसाधारण/भूमापन/एकत्रिकरण/नागरी भूमापन) (द्वारा-जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (म.रा.), पुणे
३) उपसंचालक भूमि अभिलेख, कोंकण/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर प्रदेश, मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद/ अमरावती/नागपूर (द्वारा-जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (म.रा.), पुणे
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२ मुंबई/ नागपूर
५) श्री.विलास गणपतराव शिरोळकर, जिल्हा अधिक्षक भूमि अभिलेख, भंडारा (द्वारा-जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (म.रा.), पुणे
६) मा.मंत्री (महसूल), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
७) कार्यासन अधिकारी, कार्यासन-१२, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
८) कार्यासन ल-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
९) कार्यासन ई-६ संग्रहार्थ.